**मुंबई मेट्रो २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांकरीता एशियन डेव्हल्पमेंट बँककडून प्राप्त कर्जाची रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास वितरीत करण्याबाबत (सन २०२२-२३)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२२/प्र.क्र.१५४/नवि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- २४ मार्च, २०२३.

**वाचा :**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमआरडी-३३१५/प्र.क्र.११३/नवि-७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१५.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमआरडी-३३१५/प्र.क्र.११४/नवि-७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१५.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमआरडी-३३१६/प्र.क्र.४१/नवि-७, दिनांक २५ ऑक्टोबर, २०१६.
४. नगर विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. एमआरडी-३३१६/प्र.क्र.४१/नवि-७, दिनांक २१ मार्च, २०१७.
५. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमआरडी-३३१६/प्र.क्र.१२४/नवि-७,दिनांक ०३ ऑक्टोबर, २०१७.
६. भारत सरकार व एशियन डेव्हल्पमेंट बँक यांच्या दरम्यानचा कर्ज करारनामा दिनांक ०१ मार्च, २०१९.
७. भारत सरकार, महाराष्ट्र शासन व एशियन डेव्हल्पमेंट बँक यांच्या दरम्यानचा प्रकल्प करारनामा दिनांक ०१ मार्च, २०१९.
८. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२१/प्र.क्र.१४/नवि-७, दिनांक:-२६ मार्च, २०२१.
९. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि. २४ जून, २०२१.
१०. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२१/प्र.क्र.१०६/नवि-७ दिनांक ०७ मार्च, २०२२.
११. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२१/प्र.क्र.१०६/नवि-७, दिनांक ३० मार्च, २०२२.
१२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२१/प्र.क्र.१०६/नवि-७, दिनांक ३१ मार्च, २०२२.
१३. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३ दि. ०४ एप्रिल, २०२२.
१४. नगर विकास विभाग शासन परिपत्रक क्र. बीयुडी-२०२२/प्र.क्र.३७/नवि-४, दिनांक ०८ एप्रिल, २०२२.
१५. नगर विकास विभाग, समक्रमांकाचे शासन निर्णय, दिनांक २८ सप्टेंबर, २०२२ व दिनांक ८ डिसेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

मुंबई मेट्रो लाईन-२ टप्पा-१ (दहिसर (पू) - डी.एन.नगर), मुंबई मेट्रो लाईन-७ अंधेरी (पूर्व) व दहिसर (पूर्व) व मुंबई मेट्रो लाईन-२ प्रकल्प टप्पा-२ ब डी.एन.नगर- मंडाळे या उन्नत मेट्रो रेल्वे प्रकल्पांची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत अंमलबजावणी करण्यास शासनाने संदर्भाधिन शासन निर्णय क्र.१ ते ३ नुसार मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी प्राधिकरणाचा स्वत:चा निधी, केंद्र व राज्य शासनाचे सहाय्य व बाह्य वित्तीय संस्थेचे कर्ज या माध्यमातून निधी उभारून करावयाची आहे.

मुंबई मेट्रो लाईन २अ, २ब व ७ या मेट्रो प्रकल्पांच्या प्रणाली घटकांवरील खर्चासाठी न्यु डेव्हल्पमेंट बँक व एशियन डेव्हलपमेंट बँक या दोन बाह्य वित्तीय संस्थेकडून कर्ज उपलब्ध होणार आहे. सदर प्रकल्पांसाठी एशियन डेव्हलपमेंट बँकने $९२६ मिलीयन कर्ज मंजूर केले आहे. यानुषंगाने दि.०१.०३.२०१९ रोजी एडीबी बँक, भारत सरकार व महाराष्ट्र शासन यांच्या दरम्यान प्रकल्प करारनामा व एडीबी बँक व भारत सरकार यांच्या दरम्यान कर्ज करारनामा स्वाक्षांकित करण्यात आले आहेत. त्याचप्रमाणे, सदर प्रकल्पांसाठी न्यु डेव्हल्पमेंट बँकने $२६० मिलीयन कर्ज मंजूर केले आहे. यानुषंगाने दि.२६.१२.२०१८ रोजी न्यु डेव्हल्पमेंट बँक, भारत सरकार व महाराष्ट्र शासन यांच्या दरम्यान प्रकल्प

करारानामा व न्यु डेव्हल्पमेंटबँक व भारत सरकार यांच्या दरम्यान कर्ज कराररनामा स्वाक्षांकित करण्यात आले आहेत. सदर प्रकल्पांसाठी एशियन डेव्हल्पमेंट बँकेकडून $९२६ मिलीयन व न्यु डेव्हल्पमेंट बँककडून $२६० मिलीयन असे एकूण $११८६ मिलीयन कर्ज उपलब्ध होणार आहे.

सदर प्रकल्पावर प्रकल्प अंमलबजावणी संस्था मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण प्रथम खर्च करते आणि केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती दावे एशियन डेव्हल्पमेंट बँकेस सादर करते. एशियन डेव्हल्पमेंट बँकेने सदर प्रतिपूर्ती दावे मंजूर केल्यानंतर तेवढीच रक्कम एशियन डेव्हल्पमेंट बँकेकडून केंद्रशासना मार्फत राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा करण्यात येते. सदर प्राप्त कर्ज रक्कम अर्थसंकल्पाद्वारे राज्य शासनाकडून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास कर्ज म्हणून वितरीत करावयाची आहे.

मुंबई मेट्रो २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांसाठी एशियन डेव्हल्पमेंट बँकेकडून कर्जापोटी राज्य शासनाकडून माहे डिसेंबर, २०२२ अखेर प्राप्त रु.१६२९.३३२४ कोटी एवढी कर्ज रक्कम प्राधिकरणाला वितरीत करण्यात आली आहे. आता, राज्य शासनास **एशियन डेव्हल्पमेंट बँकेच्या** प्राप्त कर्ज रक्कमेपोटी मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्प २अ, २ब व ७ करिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला चालू वित्तीय वर्ष **सन २०२२-२३** च्या मंजूर तरतूदीमधून **रु.२४५.८५३१ कोटी** इतकी रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. या अनुषंगाने खालीप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१. मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्प २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांसाठी एशियन डेव्हलपमेंट बँकेचे (LOAN NO. ३७७५-IND) केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या कर्ज रक्कमेपोटी **सन २०२२-२३** या चालू वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदी मधून **रु. २४५,८५,३१,०००/- (अक्षरी रुपये दोनशे पंचेचाळीस कोटी पंच्याऐंशी लाख एकतीस हजार फक्त)** मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र - एफ-७, ६२१७, नगर विकासासाठी कर्जे ०१, राज्य भांडवली विकास, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे (००) (०१) मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्प २अ, २ब व ७ करिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला (एमएमआरडीए) एशियन डेव्हलपमेंट बँकेचे कर्ज, सांकेतांक क्रमांक (६२१७०८९५) ५५, कर्जे व आगाऊ रक्कमा कार्यक्रम/दत्तमत्त" या लेखाशिर्षाखाली खर्च घालून सन २०२२-२३ मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५ (रोखशाखा) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच उप सचिव नवि-५ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या बाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि-३१ कार्यासनाने करावी. शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचे कडून काढून ती मुंबई महानगर प्रदेश विकास

प्राधिकरणास देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोखशाखेने देयक तयार करून ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे पाठवावे.

४. मुंबई मेट्रो २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांकरीता एशियन डेव्हल्पमेंट बँककडून प्राप्त होणाऱ्या कर्जाची रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडील “Escrow Account” मध्ये जमा झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

५. मुंबई मेट्रो २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांकरीता एशियन डेव्हल्पमेंट बँकेकडून प्राप्त होणाऱ्या कर्जाच्या रक्कमांसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने महालेखापाल यांनी विहित केलेल्या नमुन्यात लेखे ठेवावे.

६. मुंबई मेट्रो २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांकरीता एशियन डेव्हल्पमेंट बँककडून प्राप्त होणाऱ्या कर्जाच्या रक्कमेचा विनियोग एशियन डेव्हल्पमेंट बँकेसोबतच्या करारनाम्यानुसार ज्या प्रयोजनासाठी मंजूर केली आहे त्याच प्रयोजनासाठी होईल, याची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने खबरदारी घ्यावी व अशा खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी सादर करावे.

७. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशील राज्य शासन व केंद्र शासन यांना सादर करण्यात यावा तसेच लेखापरिक्षणासाठी शासनांस/शासनाने नियुक्त केलेल्या यंत्रणेस उपलब्ध करून देण्यात यावा.

८. मुंबई मेट्रो २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांकरीता एशियन डेव्हल्पमेंट बँकेकडून प्राप्त झालेल्या कर्जाच्या अनुषंगाने प्रस्तुत शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत आकारण्यात आलेले बांधिलकी शुल्क (Commitment Charges) व कर्जावरील व्याज “००४९, व्याजाच्या जमा रकमा ०४, राज्य/केंद्रशासित प्रदेश शासनाकडील व्याजाच्या जमा रकमा १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांजकडून व्याज ०१, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांजकडून व्याज (०१)(३२) एमएमआरडीए प्राधिकरणास मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्प २अ, २ब व ७ करिता एशियन डेव्हलपमेंट बँकेने दिलेल्या कर्जावरील व्याज सांकेतांक क्रमांक (००४९५०६३०१)” या लेखाशिर्षाखाली राज्य शासनाकडे तातडीने जमा करावे व भरणा केलेल्या रक्कमेच्या चलनाची प्रत शासनास सादर करावी.

९. मुंबई मेट्रो २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांकरीता एशियन डेव्हल्पमेंट बँकेकडून प्राप्त होणाऱ्या कर्जाची मुद्दल व त्यावरील व्याजाची परतफेड करारनाम्यातील वेळापत्रकानुसार राज्य शासनास होईल याची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने खबरदारी घ्यावी.

१०. मुंबई मेट्रो २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांकरीता एशियन डेव्हल्पमेंट बँकेकडून प्राप्त होणा-या कर्ज रक्कमेच्या वितरणाच्या अटी व शर्ती संदर्भात राज्य शासन व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्या दरम्यान करावयाच्या दुय्यम कर्ज करारनाम्यामध्ये (Subsidiary Loan Agreement) नमूद सर्व जबाबदाऱ्या/अटी व शर्ती यांचे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने काटेकोर पालन करावे.

११. राज्य शासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर कर्जासाठी राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

१२. सदर कर्ज वितरणाबाबत शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी दिनांक ३०/१२/२०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत जोडपत्र-अ (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

१३. राज्य शासनाकडून मुंबई मेट्रो २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांकरीता एशियन डेव्हलपमेंट बँकेकडून प्राप्त होणाऱ्या कर्ज रक्कमेपोटी आतापर्यंत रू.१५३५.४८६१ कोटी इतका कर्ज निधी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला वितरीत करण्यात आला आहे. सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणे:-

| अनु.क्र. | दिनांक | रक्कम (रु. कोटी) | निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव | एकूण वितरीत निधी (रु. कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | २६.०३.२०२१ | ९१५.०००० | राज्य शासन | ९१५.०००० |
| २ | ०७.०३.२०२२ | १७६.५१३३ | राज्य शासन | १०९१.५१३३ |
| ३ | ३०.०३.२०२२ | १९३.६७३२ | राज्य शासन | १२८५.१८६५ |
| ४ | ३१.०३.२०२२ | ७९.८१३५ | राज्य शासन | १३६५.०००० |
| ५ | २७.०९.२०२२ | १७०.४८६१ | राज्य शासन | १५३५.४८६१ |
| ६ | ०८.१२.२०२२ | ९३.८४६३ | राज्य शासन | १६२९.३३२४ |
| ७ | सदरचे वितरण | २४५.८५३१ | राज्य शासन | १८७५.१८५५ |

१४. सदर निधी वितरणासाठी वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३ दि. ०४ एप्रिल, २०२२ मधील संबंधित सर्व अटींचे तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१५. सदर निधी वितरण आदेश वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. १६ मार्च, २०२३ अन्वये प्राप्त सुचना तसेच नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.६/१४४४, दिनांक ०८.०२.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६४/व्यय-३, दिनांक १४.०३.२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२४१२५१३४७७२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.03.29 13:28:22 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
९. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
१०. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३. वित्त विभाग कार्यासन- व्यय-३, अर्थसंकल्प-१६, अर्थसंकल्प-३.
१४. नियोजन विभाग (कार्यासन १४४४)
१५. उपसचिव,नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. कक्ष अधिकारी, नवि-४/नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ .
१७. रोख शाखा (५ प्रती),
१८. निवड नस्ती, नवि-७.

**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२२/प्र.क्र.१५४/नवि-७, दिनांक २४ मार्च, २०२३ चे सहपत्र**

**जोडपत्र-अ**

**मुंबई मेट्रो २-अ, २-ब, आणि ७ प्रकल्पांकरीता एशियन डेव्हलपमेंट बँकेकडून प्राप्त झालेल्या रु. २४५.८५३१ कोटी इतक्या कर्ज सहाय्याची रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला वितरीत करण्याबाबत.**

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे(पूर्व), मुंबई-४०० ०५१ |
| २. | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६४/व्यय-३ दिनांक- १४.०३.२०२३. |
| ३. | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | $ ९२६ मिलीयन (अंदाजे रु. ६४६१.९५२१ कोटी $१=रु.६९.७८३५०० या दराने) |
| ४. | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | **सन २०२०-२१:- रु. ९१५,००,००,०००/-**<br>**सन २०२१-२२:- रु. ४५०,००,००,०००/-**<br>**सन २०२२-२३ :- रु. २६४,३३,२४,०००/-**<br>**(माहे डिसेंबर, २०२२ अखेरपर्यंत)** |
| ५. | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | **रु.२४५,८५,३१,०००/-** |
| ६. | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी | - |
| ७. | एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते | एशियन डेव्हलपमेंट बँकेसोबतच्या कर्ज करारनाम्यानुसार दि.१५ ऑगस्ट, २०२४ ते दि.१५ फेब्रुवारी, २०४४ या कालावधीमध्ये प्रत्येक सहामाही हप्त्यामध्ये याप्रमाणे एकूण ४० हप्त्यामध्ये परतफेड करावयाची आहे. |
| ८. | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | $ २३.१५ मिलीयन (सहामाही हप्ता) |
| ९. | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | सहामाही |
| १०. | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | कर्ज करारावर स्वाक्षरी केल्याच्या दिनांकापासून ५ वर्षे |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.03.29 13:28:39 +05'30'

**[ विजय चौधरी ]**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| ११. | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | दि.१५ ऑगस्ट, २०२४ ते दि.१५ फेब्रुवारी, २०४४ पर्यंत (सहामाही हप्त्यामध्ये) |
| १२. | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | दि. १५ ऑगस्ट, २०२४. |
| १३. | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | दि. १५ फेब्रुवारी, २०४४. |
| १४. | व्याज दर | एशियन डेव्हल्पमेंट बँकेसोबतच्या कर्ज करारनाम्यातील सेक्शन २.०२ येथे नमूद केल्याप्रमाणे |
| १५. | विलंब कालावधीसाठी दंडनीय व्याजदर व इतर आकार | निरंक |
| १६. | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | सहामाही |
| १७. | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | "मागणी क्र - एफ-७, ६२१७, नगर विकासासाठी कर्जे ०१, राज्य भांडवली विकास, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे (००) (०१) मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्प २अ, २ब व ७ करिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला (एमएमआरडीए) एशियन डेव्हलपमेंट बँकेचे कर्ज, सांकेतांक क्रमांक (६२१७०८९५) ५५, कर्जे व आगाऊ रक्कमा कार्यक्रम/दत्तमत्त" |
| १८. | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | मागणी क्र - एफ-७ ६२१७, नगर विकासासाठी कर्जे ०१, राज्य भांडवली विकास १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे (००)(०१) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने (एमएमआरडीए) मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्प २अ, २ब व ७ करिता एशियन डेव्हलपमेंट बँकेकडून घेतलेल्या कर्जाच्या मुद्दलाची वसुली सांकेतांक क्रमांक (६२१७५०७३०१) |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.03.29 13:28:56 +05'30'

**[ विजय चौधरी ]**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

| | | |
|---|---|---|
| १९. | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | “००४९, व्याजाच्या जमा रकमा ०४, राज्य/केंद्रशासित प्रदेश शासनाकडील व्याजाच्या जमा रकमा १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांजकडून व्याज ०१, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांजकडून व्याज (०१) (३२) एमएमआरडीए प्राधिकरणास मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्प २अ, २ब व ७ करिता एशियन डेव्हलपमेंट बँकेने दिलेल्या कर्जावरील व्याज सांकेतांक क्रमांक (००४९५०६३०१)” |
| २०. | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | एशियन डेव्हल्पमेंट बँक<br>६ एडीबी अव्हेन्यू, मंडलयुंग सिटी,<br>१५५० मेट्रो मनिला, फिलीपिन्स |
| २१. | शासकिय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | मुख्य लेखा अधिकारी<br>मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,<br>वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे(पूर्व), मुंबई. |
| २२. | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>डी. डी.ओ. नंबर-७१०१००२३०१ |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.03.29 13:29:13 +05'30'

**[ विजय चौधरी ]**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

******